**सन २०२०-२१ करिता कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने) कुंडल (कार्यक्रम) (२४१५-१०६८) ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) करिता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.६७/फ-९**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक :- २३ ऑक्टोबर, २०२०

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल, २०२०
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. ०४ मे, २०२०
३. महसूल व वन विभाग शासन निर्णय समक्रमांकित दिनांक २५.०६.२०२०
४. महसूल व वन विभाग, पत्र क्र.एमएफएस-२०२०/प्र.क्र.१/फ-२, दिनांक ०८.०९.२०२०
५. प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/चाबाप्र/प्र.क्र.३९(२०१९-२०)/१६९/२०२०-२१, दिनांक १८.०९.२०२०

**प्रस्तावना :-**

कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने) याचे करीता सन २०२०-२१ या वर्षामध्ये कुंडल येथे वन प्रशिक्षण केंद्राची स्थापना करणे (२४१५ १०६८) या लेखाशिर्षाअंतर्गत ३६- सहाय्यक अनुदाने (वेतन) रुपये २५०.०० लक्ष व ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) रु.२५०.०० लक्ष व असे एकूण रु.५००.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करुन दिलेला आहे. तथापि, वित्त विभागाचे संदर्भ क्र.१ व २ चे परिपत्रक व शासन निर्णयानुसार तसेच या विभागाचे संदर्भ क्र.४ दिनांक ०८.०९.२०२० रोजीच्या पत्रान्वये रु.२५०.०० लक्ष इतक्या निधीस वित्त विभागाने सहमती दिलेली आहे.

कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने) कुंडल (कार्यक्रम) (२४१५-१०६८) या योजनेकरीता सन २०२०-२१ करीता **“३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) रु.१२५.०० लक्ष** व ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) रु.२५.०० लक्ष असे एकूण **रु.१५०.०० लक्ष** इतका निधी BDS वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेले आहेत. त्यापैकी संदर्भ क्र.३ चे शासन निर्णयान्वये ३६- सहाय्यक अनुदाने (वेतन) - रु.६२.५० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडून संदर्भ क्र.५ अन्वये ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) अंतर्गत रु.१८७.५० लक्ष अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत विनंती केलेली आहे. त्यानुसार या कामासाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.५ नुसार सादर केलेला प्रस्ताव व वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ व २ येथील परिपत्रक व शासन निर्णय तसेच या विभागाचे संदर्भ क्र.४ चे पत्र विचारात घेता प्रस्तावातंर्गत मागणी लक्षात घेऊन कुंडल येथे वन प्रशिक्षण केंद्राची

स्थापना करणे (२४१५ १०६८) या योजनेमधून सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरीता कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने) कुंडल येथील अधिकारी व कर्मचाऱ्यांचे वेतनाकरीता **३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) अंतर्गत रु.६२.५० लक्ष** इतका निधी खालील अटी व शर्तीचे अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे.

२. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

३. नियंत्रक अधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, एकूण वितरीत केलेल्या/करण्यात येणाऱ्या तरतूदीपेक्षा कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

४. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.

५. संस्थेने आर्थिक वर्ष २०२०-२१ मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.

६. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

७. संस्थेने मागील वर्षाकरिता त्यांना उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२ नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

८. उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरीता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

९. प्रत्यक्ष खर्च करण्यापूर्वी विहीत पध्दतीचे पालन करावे व आवश्यकतेनुसार आहरण करावे.

१०. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक १६.०४.२०२०, २६.०५.२०२० चे परिपत्रक व दि.४.५.२०२० चा शासन निर्णयातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

११. सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्र.सी-७ प्रधान शिर्ष- २४१५- कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०६-वनीकरण, २७७-शिक्षण (००) (०२) वन विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने) कुंडल (कार्यक्रम) ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) (२४१५-१०६८) या लेखाशिर्षा अंतर्गत सन २०२०-२१ मध्ये उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक १६.०४.२०२० चे परिपत्रक व दिनांक ०४.०५.२०२० चा शासन निर्णय तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/ २०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२३१७२३२८१५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

GAJENDRA PRAKASH NARWANE

Digitally signed by GAJENDRA PRAKASH NARWANE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=088951d0088e627aa56c9ab088add1677b8ac27d637c5cdf80b730f756dce9e8, cn=GAJENDRA PRAKASH NARWANE
Date: 2020.10.23 16:42:24 +05'30'

**( गजेंद्र नरवणे )**
**उप सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
४. मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. महासंचालक, कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने), कुंडल.
६. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. सह सचिव/उपसचिव,वित्त विभाग (अर्थ-३)/(व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
८. उप सचिव, नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
९. कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)